**कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित दर्जा दिल्यानंतर सहाय्यक अभियंता श्रेणी-२ व शाखा अभियंता म्हणून करावयाच्या वेतननिश्चितीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२८८/सेवा-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक : २७ नोव्हेंबर,२०१९

**वाचा :-** १. पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्रमांक सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/आ.१०, दिनांक १६.०४.१९८४
२. पाटबंधारे विभाग, शासन क्रमांक सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/आ.१०, दिनांक १९.०७.१९८४
३. शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठता-११८८/(१३४/८८)/आ.स.अ.श्रे.२,दि.१२.४.१९८९
४. जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक एसयुटी-१२११/प्र.क्र.२४७/आस्थापना (शा.अ.) दिनांक ६.१२.२०१४

**शासन परिपत्रक :-**

पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्र.सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/आ.१०, दि.१६.४.१९८४ अन्वये पाटबंधारे व सार्वजनिक बांधकाम विभाग या दोन्ही विभागांतर्गत स्थापत्य, यांत्रिकी, विद्युत व यांत्रिकी तसेच कृषी अभियांत्रिकी क्षेत्रातील कार्यरत असलेल्या पदवीधर कनिष्ठ अभियंत्यांना व विहित सेवाकाल पूर्ण करणा-या पदविकाधारक, अर्हतारहित कनिष्ठ अभियंत्यांना दिनांक १.४.१९८१ या पूर्वलक्षी प्रभावाने राजपत्रित दर्जा वर्ग-२ (कनिष्ठस्तर) म्हणजेच सहाय्यक अभियंता श्रेणी-२ व शाखा अभियंता असे संबोधण्याबाबत व त्यांना समान वेतनश्रेणी रु.६००-३०-७५०-४०-९५० मंजूर केल्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. उपरोक्त पाटबंधारे विभागाच्या आदेशानुसार कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित दर्जा दिल्यानंतर सहाय्यक अभियंता श्रेणी-२ व शाखा अभियंता म्हणून त्यांची वेतन निश्चिती कशा प्रकारे करावी याबाबत पाटबंधारे विभाग, शासन निर्णय दि.१९.७.१९८४ निर्गमित करण्यात आला. त्यांनतर या अधिका-यांच्या वेतननिश्चितीमधील अडचणी दूर करण्यासाठी पाटबंधारे विभाग, शासन परिपत्रक क्र.ज्येष्ठता-११८८/(१३४/८८)/आ.स.अ.श्रे.२, दि.१२.४.१९८९ निर्गमित करण्यात आले आहे.

३. कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर करावयाच्या वेतननिश्चितीबाबत उपरोक्त शासन परिपत्रक दि.१२.४.१९८९ अन्वये दिलेल्या सूचनेनुसार वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर या अभियंत्यांची वेतननिश्चिती करतांना त्यांच्या वेतनवाढीचा दिनांक

बदलण्यात आल्यामुळे अभियंत्यांना झालेल्या अतिप्रदानाच्या वसुलीच्या विरोधात श्री.अ.मा.देशपांडे व इतर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.४२१/१९९३ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दि.१७.८.१९९५ रोजी दिलेल्या निकालानुसार कनिष्ठ अभियंत्यांना शाखा अभियंता पदावर देण्यात आलेली दर्जोन्नती ही त्यांच्या कर्तव्य व जबाबदा-या यामध्ये वाढ न होता देण्यात आली असल्याने त्यांना समयश्रेणीतील (नवीन वेतनश्रेणी) वेतन लागू झाले नसल्याने म.ना.से. (वेतन) नियम १९८१ मधील नियम ३९(२) नुसार वेतनवाढीचा दिनांक बदलता येणार नाही, असा निर्णय दिला आहे. तसेच अन्य अभियंता श्री. सुभाषचंद्र आर. राजे यांच्या वेतननिश्चितीमुळे झालेल्या अतिप्रदानाची त्यांच्या सेवानिवृत्ती वेतनातून सुरु करण्यात आलेल्या वसुलीविरुध्द श्री. सुभाषचंद्र आर. राजे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मुबई येथे ५४१/२०१९ दाखल केला होता. सदर दाव्यामध्ये दि.१७.६.२०१० रोजी श्री. सुभाषचंद्र आर.राजे यांच्या बाजूने न्यायनिर्णय झाला असून, श्री. राजे यांना झालेल्या अतिप्रदानाची वसूली न करण्याचे आदेश देण्यात आले आहेत.

४. उपरोक्त श्री.अ.मा. देशपांडे व श्री. सुभाषचंद्र आर. राजे यांच्याप्रकरणी झालेल्या न्यायनिर्णयाप्रमाणे वेतनवाढीचा लाभ मिळणेबाबत श्री. सु.द. बनगीनवार व इतर अभियंता यांनी त्यांच्या वेतन निश्चितीबाबत दाखल केला होता. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी सदर मूळ अर्ज क्र.५७८/२०११ मध्ये दि.२६.८.२०११ रोजी अंतिम निर्णय दिला असून याचिकाकर्त्यांनी वेतन निश्चितीबाबत शासनाच्या सक्षम प्राधिकरणाकडे अर्ज करण्याचे आदेश दिले असून व अशा अर्जावर प्राधिकरणाने योग्य तो निर्णय घ्यावा असे निर्देश देवून याचिका निकाली काढली आहे.

५. जलसंपदा विभागाने, कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर सहाय्यक अभियंता श्रेणी-२ व शाखा अभियंता पदावरील नियुक्ती ही त्यांच्या कर्तव्य व जबाबदा-या यामध्ये वाढ न होता देण्यात आली असल्याने त्यांना समयश्रेणीतील (नवीन वेतनश्रेणी) वेतन लागू झाले असल्याने म.ना.से. (वेतन) नियम,१९८१ मधील नियम ३९ (२) (अ) अन्वये दर्जोन्नतीपूर्वीचा वेतनवाढीचा दिनांक कायम राहील,असे आदेश दि.६.१२.२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित केले असल्याने, त्याच धर्तीवर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अभियंत्यांनाही सदरची बाब लागू करण्याबाबत अनेक अभियंत्यांनी विनंती केली आहे. जलसंपदा विभागाप्रमाणे तसेच श्री. अ.मा. देशपांडे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.४२१/१९९३ मध्ये मा.न्यायाधिकरणाने दि.१७.८.१९९५ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार सार्वजनिक बांधकाम विभागातील कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर दर्जोन्नतीपूर्वीचा वेतनवाढीचा दिनांक कायम राहील.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्तळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१९११२७१६५६२९४०१८ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

VAISHALI MANISH SULE

Digitally signed by VAISHALI MANISH SULE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=0e39186eb174ffc2d5d67d71804bf385073457ed318697
0cc74a272f3074c496, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=cacc4e5906a45e67bca76eac2f10992fbf69020ed4
ea4e45fa58b2a72eef683f, ou=PUBLIC WORKS, o=GOVERNMENT
OF MAHARASHTRA, cn=VAISHALI MANISH SULE
Date: 2019.11.27 17:02:46 +05'30'

**( वैशाली सुळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम) / मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव,
३. अपर मुख्य सचिव (सा.बां.विभाग) यांचे स्वीय सहाय्यक,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर/ अमरावती/ औरंगाबाद/ कोकण/ नाशिक/मुंबई/पुणे,
६. मुख्य अभियंता (राष्ट्रीय महामार्ग), सार्वजनिक बांधकाम विभाग,कोकणभवन, नवी मुंबई,
७. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ /मंडळ,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. कार्यासन सेवा-३ (निवडनस्ती) .